**समाज जागृती व सेवासंघ मोहोने, ता. कल्याण जिल्हा ठाणे द्वारा संचलित विजाभज प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा मौजे मोरोची ता. माळशिरस जि. सोलापूर, येथे स्थलांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. विभशा २०१४/प्र.क्र.२२२/विजाभज-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ३० ऑगस्ट,२०१४.

**वाचा :-**

१) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग/क्र. विभशा-२००७/प्र.क्र.०९२/मावक-६ दि. १ ऑगस्ट, २००७.
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग/ क्र. विभशा-२०१४/प्र.क्र.०७/विजाभज-२दि. १३ मे, २०१४.
३) संचालक विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे यांचे पुत्र / क्र. विजाभज/आशा/स्थलांतर/प्राथ/मोहोने/२०१४-१५/१०५५/ दि. १९ ऑगस्ट, २०१४.

**प्रस्तावना :-**

समाज जागृती व सेवासंघ मोहोने, ता. कल्याण जिल्हा ठाणे द्वारा संचलित विजाभज प्राथमिक माध्यमिक आश्रमशाळा मौजे मोरोची ता.माळशिरस जि. सोलापूर, येथे स्थलांतरीत करणेबाबत संस्थेने केलेल्या विनंतीनुसार संचालक, विजाभज, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावावर विचार करण्यात येऊन दि. १ ऑगस्ट, २००७ व दि. १३ मे, २०१४ च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार तसेच ज्या आश्रमशाळेच्या परिसरात विजाभज या प्रवर्गाची लोकसंख्या अपुरी आहे तसेच तेथील भौगोलिक परिस्थिती व इतर सोयी सुविधा संस्थेची गुणवत्ता तसेच सध्या ज्या ठिकाणी प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा चालविली जाते. ती इमारत अपूर्ण असुन शाळेसाठी आवश्यक असलेल्या वर्ग खोल्याची स्वत्रंत इमारत भाडे तत्वावर अथवा विकत मिळत नाही. तसेच सद्या शाळा सुरु असलेल्या ठिकाणी पुर सदृष्या स्थिती असल्याने आणि या बाबत सदर शाळेस वेळोवेळी भेट देण्या-या अधिका-यांनी याबाबत शेरे बुकात घेतलेली नोंद  इ. बाबी विचारात घेऊन सदर आश्रमशाळा त्याच संस्थेमार्फत चालविण्यासाठी स्थलांतर करण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

समाज जागृती व सेवासंघ मोहोने, ता. कल्याण जिल्हा ठाणे द्वारा संचलित विजाभज प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा मोहोने जि.ठाणे ही आश्रमशाळा मौजे मोरोची ( गट क्रं १९३ /०१/१३ ) ता. माळशिरस जि. सोलापूर येथे सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षापासून स्थलांतरीत करण्यास पुढील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर संस्थेचे स्थलांतर केल्यामुळे शासनावर कोणताही आर्थिक अधिभार पडणार नाही या अटीस अधीनं राहून.

२) सदर आश्रमशाळेचे स्थलांतर करण्यापूर्वी आश्रमशाळेतील सर्व विस्थापित होणारे विद्यार्थी अन्य शाळेमध्ये समायोजित करुन देण्याच्या अटी अधीन राहून सदर प्राथमिक व माध्यामिक आश्रमशाळेचे स्थलांतर करण्यात येत आहे.

३) उक्त आश्रमशाळेत कार्यरत असलेल्या व कायम मान्यता प्राप्त असलेल्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांनी स्थलांतरीत ठिकाणी तातडीने कामावर हजर होणे आवश्यक राहील. अन्यथा त्यांना नोकरीची गरज नाही असे समजून त्यांच्या सेवा कायम स्वरुपी संपविण्यास येतील. अशा कर्मचा-यांच्या रिक्त जागेवर त्या संस्थेतील, जिल्हयातील, विभागातील किंवा राज्यातील अतिरिक्त कर्मचा-यांच्या यादीमधून मागासवर्गीयांचे आरक्षण विचारात घेऊन सेवाज्येष्ठतेनुसार कर्मचा-याचे समायोजन करण्यात यावे.

४) सदर आश्रमशाळेचे स्थलांतरण झाल्यामुळे भविष्यात काही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास किंवा आर्थिक भाराचा प्रश्न उद्भवल्यास तो खर्च करण्याची जबाबदारी संस्थेची राहील.

५) सदर आश्रमशाळा स्थलांतरीत होण्यापूर्वी आश्रशाळेत प्रवेशित असलेले निवासी विद्यार्थ्यांना स्थलांतरीत ठिकाणाच्या विजाभज प्राथमिक आश्रमशाळेत प्रवेश देण्यात यावा. या निवासी व अनिवासी विद्यार्थ्यांच्या कोणत्याही तक्रारी उद्भवणार नाहीत याची खबरदारी संस्थेने घ्यावी.

६) स्थलांतरीत ठिकाणी संस्थेने सहा महिन्याच्या आत निवासी व अनिवासी विद्यार्थ्यांसाठी आवश्यक ते वर्ग, शौचालये, स्नानगृहे, स्वयंपाकगृह, कोठीघर, निवासीसाठी वसतीगृह इमारत, पाणीसाठवण्याची व्यवस्था, सांडपाण्याचा निचरा होण्याची व्यवस्था, बायोमेट्रीक यंत्रणा कार्यान्वीत करणे इत्यादी सर्व सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक राहील.

७) सदर आश्रशाळा स्थलांतरणाच्या अनुषंगाने कोणत्याही नवीन पदास मान्यता देण्यात येणार नाही.

८) सदर आदेश शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८३०१६०६४३८१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shivaji Sonaji Choure

Digitally signed by Shivaji Sonaji Choure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shivaji Sonaji Choure
Date: 2014.08.30 16:03:33 +05'30'

( शिवाजी चौरे )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, ३ चर्च रोड, पुणे.
२. प्रादेशिक उपायुक्त समाजकल्याण विभाग, कोकण / पुणे.
३. सहायक आयुक्त समाजकल्याण, ठाणे / सोलापूर.
४. महालेखापाल महाराष्ट्र १ ( लेखा परीक्षा वा लेखा अनुज्ञेयता ) मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
६. मा. मंत्री ( सा.न्या.) यांचे खाजगी सचिव.
७. अध्यक्ष समाज जागृती व सेवासंघ मोहोने, ता. कल्याण जिल्हा ठाणे
८. निवड नस्ती.